**दिनांक ०१ जानेवारी २०१८ रोजी मौजे कोरेगांव-भिमा व सणसवाडी, ता.शिरुर जि. पुणे येथे झालेल्या दंगलीतील आपद्ग्रस्तांना आर्थिक मदत देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१८/प्र.क्र.८८/म-०३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०३ ऑगस्ट, २०१८

**वाचा:-**

१) जिल्हाधिकारी,पुणे यांचे पत्र क्रमांकः पगम/कावि/९७४/२०१८, दिनांक २०.०२. २०१८
२) जिल्हाधिकारी पुणे यांचे पत्र क्रमांक पगम/कावि/१५८३/२०१८, दिनांक १९.०४.२०१८

**प्रस्तावना:-**

जिल्हाधिकारी पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक १ येथील पत्रान्वये, मौजे कोरेगांव-भिमा व सणसवाडी, ता.शिरुर जि. पुणे येथे दिनांक ०१ जानेवारी २०१८ रोजी झालेल्या जातीय दंगलीच्या घटनेमध्ये बाधित झालेल्या व्यक्तींच्या मालमत्तांचे सुमारे रु. ७,९७,९०,६७०/- इतके नुकसान झाल्याचे कळवून बाधितांना मदत वितरित करण्यासाठी निधीची मागणी केली आहे. तद्नंतर जिल्हाधिकारी पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर करून मा.मुख्यमंत्री यांनी विधिमंडळात दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने पंचनाम्यानुसार सर्व नुकसानग्रस्त बाधित व्यक्तींना पुर्णत: नुकसान भरपाई मिळणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मौजे कोरेगांव-भिमा व सणसवाडी, ता.शिरुर जि. पुणे येथील दंगलीमध्ये बाधित झालेल्या आपदग्रस्तांना मदत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे:

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार दिनांक १ जानेवारी २०१८ रोजी मौजे कोरेगांव-भिमा व सणसवाडी, ता.शिरुर जि. पुणे येथे झालेल्या दंगलीच्या घटनेमध्ये बाधित झालेल्या आपदग्रस्तांना झालेल्या नुकसानीसाठी पंचनाम्यानुसार देय असलेल्या नुकसान भरपाईपोटी आर्थिक मदतीचे वाटप करण्यासाठी रु.७,९७,९०,६७०/-(रुपये सात कोटी सत्त्याण्णव लाख नव्वद हजार सहाशे सत्तर फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत असून बाधित व्यक्तींना त्याचे वाटप करण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. याबाबतचा खर्च "मागणी क्र.सी-५, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००-इतर कार्यक्रम, (०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ ०३४७) या लेखाशीर्षाखाली जुलै,२०१८ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त दंगलीमध्ये नुकसान नुकसान झालेल्या मालमत्तांच्या नुकसानीसाठी पंचनाम्यानुसार निश्चित करण्यात आलेली नुकसानीची रक्कम त्यांना आर्थिक मदत म्हणून प्रदान करण्यात यावी. मदतीची रक्कम बाधितांच्या बँक खात्यामध्ये थेट जमा करण्यात यावी. कोणालाही रोखीने रक्कम प्रदान करण्यात येऊ नये .

४. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उप कोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या देयकासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक स्लीपमध्ये गौण/उप शिर्षाचा गणकयंत्र-संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच या प्रकरणी होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालांच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे पाठवावेत.

५. सदर प्रकरणी खर्चाचे पत्रक न चुकता महसूल व वन विभागाला प्राप्त होईल, याची जिल्हाधिकारी, पुणे यांनी दक्षता घ्यावी. नियंत्रक अधिकाऱ्यांनी याबाबतचा हिशेब ठेवून निधीच्या विनियोगाबाबतची माहिती व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास ३१ जानेवारी, २०१९ पूर्वी सादर करावे. ज्या प्रयोजनासाठी रक्कम मंजूर करण्यात आली आहे त्याच प्रयोजनासाठी सदर रक्कम खर्ची टाकण्यात यावी. संपूर्ण रक्कम खर्च होणार नसल्यास विहित कालावधीत बचतीची रक्कम शासनास समर्पित करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक विवि/शिकाना/३७६,दिनांक १९/७/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०३१६४५४७४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Ramchandra Bagane

Digitally signed by Dilip Ramchandra Bagane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9bdeba4f5b208a7811899a0f4522d8086dc2e6e2655bea26b70db55378254d2, serialNumber=a4ff332f80ce4e5a25f28d86597d7ac1c7ca6c95d9241be4eb51488570f63a29, cn=Dilip Ramchandra Bagane
Date: 2018.08.03 16:49:30 +05'30'

**( दि.रा.बागणे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव (गृह),मंत्रालय,मुंबई
५. विभागीय आयुक्त, पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर

८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
९. जिल्हाधिकारी, पुणे.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन,
१२. वित्त विभाग (व्यय-०९/अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई-३२.
१३. कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१, म-११/पीएसी व पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (कार्यासन म-०३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.